**लाचलुचपत प्रतिबंधक कायदा/फौजदारी गुन्हा दाखल होऊन अटक झाल्यानंतर जामिन मंजूर केलेल्या अधिकारी/कर्मचारी यांच्या प्रकरणी करावयाची कार्यवाही.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन परिपत्रक क्र. राजस-२०१८/प्र.क्र.३८१/५स**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : - २६ डिसेंबर, २०१८

<u>वाचा</u> - १. महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपिल) नियम, १९७९
२. विभागीय चौकशी नियमपुस्तिका चौथी आवृत्ती, १९९१

**<u>शासन परिपत्रक :-</u>**

शासन सेवेतील अधिकारी/कर्मचारी यांच्याविरुध्द लाचलुचपत प्रतिबंधक कारवाईमध्ये अथवा अन्य फौजदारी प्रकरणात गुन्हा नोंद होऊन संबंधीत अधिकारी/कर्मचारी यांना अटक करण्यात येते. अटक झाल्यानंतर संबंधीत अधिकारी/कर्मचारी यांच्या कार्यालयास लाचलुचपत अथवा पोलिस विभागाकडून केलेल्या कार्यवाहीची माहीती प्राप्त होणे, अशा अधिकारी/ कर्मचारी यांच्या अटक व तदनंतर अटकेच्या निश्चित कालावधीची माहीती प्राप्त होणे, अटकेचा कालावधी हा ४८ तास किंवा त्यापेक्षा अधिक असल्यास मानिव निलंबनाची शिफारस प्राप्त होणे, नियुक्ती प्राधिकारी या नात्याने राजपत्रित अधिकारी यांच्या निलंबनाबाबत शासनस्तरावरुन आदेश निर्गमित होणे आणि निलंबन आदेश संबंधीत अधिकारी/कर्मचारी यांना बजावणे या सर्व प्रक्रियेमध्ये काही कालावधी व्यतीत होतो.

विभागीय स्तरावरील आणि पोलिस विभागाकडील अशी माहिती प्राप्त करुन घेऊन व आवश्यकतेनुसार अतिरिक्त माहिती/अहवाल प्राप्त झाल्यानंतर नियुक्ती प्राधिकारी या नात्याने निलंबन/ मानिव निलंबनाचे आदेश शासन स्तरावरुन निर्गमित होईपर्यंत लाचलुचपत अथवा फौजदारी कारवाईच्या प्रकरणात अटक करण्यात आलेला अधिकारी/कर्मचारी मा.न्यायालयाकडून जामिन मिळाल्यानंतर तात्काळ त्याचे पूर्वीच्या पदावर हजर होऊन कार्यालयीन कामकाज करतात असे शासनाचे निदर्शनास आले आहे.

वास्तविक, महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपील) नियम, १९७९ च्या नियम ४ (२) मधील तरतुदी तसेच विभागीय चौकशी नियमपुस्तिका चौथी आवृत्ती, १९९१ चे नियम २.२ मधील तरतुदी विचारात घेता, शासकीय अधिकारी/कर्मचारी यास फौजदारी आरोपाखाली किंवा अन्यथा ४८ तासाहून अधिक कालावधीपर्यंत पोलिस कोठडीत किंवा न्यायालयीन कोठडीत अटकेत ठेवले असेल तर त्याला अटकेत ठेवल्याच्या दिनांकापासून नियुक्ती प्राधिकरणाच्या आदेशाव्दारे निलंबनाधीन ठेवल्याचे मानण्यात येईल अशी तरतुद आहे. सदर तरतूद विचारात घेता, लाचलुचपत वा अन्य फौजदारी प्रकरणात अटक झाल्यानंतर व अटकेचा कालावधी जर ४८ तासापेक्षा अधिक असेल तर संबधीत अधिकारी/कर्मचारी हा आपोआपच मानिव दिनांकाने अटकेच्या दिनाकांपासून निलंबित होतो आणि महाराष्ट्र शासनाच्या सेवेतील सर्व अधिकारी/कर्मचारी यांना ही स्वयंस्पष्ट तरतूद ज्ञात असल्याने, त्यांचे निलंबन होणार ही बाब त्यांना माहित असून देखील संबंधीत अधिकारी/ कर्मचारी हा मा.न्यायालयाकडून जामीन मिळल्यानंतर पूर्वीच्या पदावर हजर होऊन कार्यालयीन व वैधानिक कामकाज सुरु करतो ही बाब नक्कीच कार्यालयीन गैरवर्तणुकीची आहे.

मात्र, अशा प्रकरणात संबधीत अधिकारी/कर्मचारी यांचे बाबत नेमकी कोणती कार्यवाही करावी याबाबत महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपिल) नियम १९७९ व विभागीय चौकशी नियमपुस्तिका चौथी आवृत्ती १९९१ मध्येही कोणतीही स्वयंस्पष्ट तरतूद नसली तरी महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपील) नियम, १९७९

च्या नियम ४ (२) मधील तरतूद तसेच विभागीय चौकशी नियमपुस्तिका चौथी आवृत्ती, १९९१ चे नियम २.२ मधील तरतूदीनुसार संबंधीत अधिकारी/कर्मचारी हा निलंबन कारवाईस पात्र होतो. तसेच मानिव निलंबनाचे आदेश हे फक्त नियुक्ती प्राधिकारी यांचेस्तरावरुनच निर्गमित होणे आवश्यक आहे ही तांत्रिक बाब विचारात घेता, अशा तरतूदींचा गैरफायदा घेऊन अटक करण्यात आलेला अधिकारी / कर्मचारी हे मा.न्यायालयाकडून जामिन मिळाल्यानंतर व नियुक्ती प्राधिकारी यांचेस्तरावरुन मानिव निलंबनाचे आदेश निर्गमित होईपर्यंच्या कालावधीत पूर्वीच्या पदावर कामकाज करत राहतात आणि वैधानिक आदेश निर्गमित करतात. त्यामुळे भविष्यात अशा अधिकारी यांचेकडून घेण्यात आलेल्या निर्णयांच्या वैधानिकतेबाबतही न्यायालयीन प्रकरणे उद्भवू शकतात.

त्यानुषंगाने लाचलुचपत प्रतिबंधक कायदा/फौजदारी गुन्हा दाखल होऊन अटक झाल्यानंतर जामिन मंजूर केलेल्या अधिकारी/कर्मचारी यांना निलंबीत करेपर्यंतच्या कालावधीत खालीलप्रमाणे सर्वसमावेशक निर्देश देण्यात येत आहेत :-

**१. <u>लाचलुचपत प्रतिबंधक कायदा/ फौजदारी गुन्हा दाखल होऊन अटक झाल्यानंतर जामिन मंजूर केलेल्या अधिकारी / कर्मचारी यांच्या पदभाराबाबत :-</u>**

१.१ शासकीय कर्मचाऱ्याविरुध्द लाचलुचपत प्रतिबंधक कारवाईमध्ये अथवा अन्य फौजदारी प्रकरणात गुन्हा नोंद होऊन संबंधीत कर्मचाऱ्यास अटक करण्यात आल्याची बाब निदर्शनास येताच सदर कर्मचारी यांचे नजीकच्या नियंत्रण अधिकारी/वरिष्ठ अधिकारी यांनी सदर अधिकारी/ कर्मचारी यांचे पदाचा पदभार अन्य नजीकच्या समकक्ष/लगतच्या कनिष्ठ कर्मचारी यांचेकडे सोपवावा.

१.२ अटक करण्यात आलेल्या शासकीय अधिकारी/कर्मचारी यांना जामिन मंजूर झाला तरी शासनस्तरावरुन त्यांचे निलंबन अथवा बदली बाबतचे आदेश निर्गमित होईपर्यंत संबंधीत अधिकारी / कर्मचारी यांना त्यांचे मूळ पदावर काम करण्यास प्रतिबंध करावा.

१.३ अशा अधिकारी/कर्मचारी यांचे कामकाज अन्य अधिकारी/कर्मचारी यांचेकडे हस्तांतरीत करुन, सदर अधिकारी/कर्मचारी यांना त्यांचे नजीकच्या वरिष्ठ कार्यालयात अकार्यकारी पदावर कामकाज करण्यास सांगावे.

१.४ अशा अधिकारी/कर्मचारी यांचेकडे कोणतेही धोरणात्मक किंवा वैधानिक अधिकार असलेले कामकाज देण्यात येऊ नये.

**२. <u>लाचलुचपत प्रतिबंधक कायदा/ फौजदारी गुन्हा दाखल होऊन अटक झाल्यानंतर जामिन मंजूर केलेल्या अधिकारी / कर्मचारी यांच्याबाबत शासनास / वरिष्ठ कार्यालयास अवगत करणे : -</u>**

२.१ शासकीय कर्मचाऱ्याविरुध्द करण्यात आलेल्या कार्यवाहीबाबतची (गुन्हा नोंद, अटक, इ.) माहीती तात्काळ वरीष्ठ कार्यालयास व शासनास सादर करावी.

२.२ तदनंतर संबंधीत शासकीय कर्मचाऱ्यास मा.न्यायालयाकडून जामिन मंजूर झाला किंवा कसे याबाबतची अनुषंगीक माहिती संबंधीत विभागाकडून प्राप्त करुन घेऊन अशा शासकीय कर्मचारी यांचा पोलिस/न्यायालयीन कोठडीतील अटकेच्या कालावधीची परीगणना करुन त्याच्या निश्चित अटकेच्या

कालावधीबाबतची माहिती (४८ तासापेक्षा कमी वा जास्त) तात्काळ शासनास व वरिष्ठ कार्यालयास सादर करावी.

२.३ लाचलुचपत अथवा पोलिस विभागाचे संपर्कात राहून संबंधीत विभागाकडून सुरु असलेल्या कार्यवाहीबाबतची सद्य:स्थिती वेळोवेळी प्राप्त करुन घेऊन ती वरिष्ठ कार्यालयास सादर करावी.

२.४ अशा अधिकारी/कर्मचारी यांचे बाबत मा.न्यायालयाकडून कोणतेही आदेश प्राप्त होताच ते तात्काळ शासनाचे निदर्शनास आणून देण्यात यावेत.

२.५ निलंबीत अधिकारी यांचे पुनर्स्थापेनेचे अनुषंगाने शासनस्तरावरुन अशा अधिकारी / कर्मचारी यांचे बाबत त्यांचे निर्वाह भत्ता व सेवाविषयक बाबींचे अनुषंगाने मागविण्यात आलेली माहिती तात्काळ शासनास सादर करण्यात यावी.

**३. <u>लाचलुचपत प्रतिबंधक कायदा/ फौजदारी गुन्हा दाखल होऊन अटक झाल्यानंतर जामिन मंजूर केलेल्या अधिकारी / कर्मचारी यांची कार्यालयीन तपासणी :-</u>**

३.१ लाचलुचपत प्रतिबंधक कायदा अन्वये गुन्हा नोंद होताच अशा अधिकारी/कर्मचारी यांच्या कार्यालयाची तात्काळ दप्तर तपासणी नजीकच्या नियंत्रण अधिकारी यांनी करुन घ्यावी.

३.२ संबंधीत अधिकारी / कर्मचारी यांच्या कार्यालयाची व दप्तराची त्यांचे पूर्वीचे कामकाजाचे अनुषंगाने तपासणी करुन, तपासणीत निदर्शनास येणाऱ्या बाबींचे अनुषंगाने तसेच अशा अधिकारी यांचे कार्यालयीन वर्तन, हाताळलेली प्रकरणे, गोपनिय अहवालातील प्रतिकुल नोंदी (असल्यास) पूर्वातिहास इ. अभ्यास करुन जे विभागीय चौकशीमध्ये निर्विवाद सिध्द होऊ शकतील अशा दोषारोपांचा समावेश करावा.

३.३ अशा अधिकारी/कर्मचारी यांच्याविरुध्द लाचलुचपत अथवा फौजदारी गुन्हयाचे अनुषंगाने दोषारोप निश्चित करताना प्रकरणातील घटना, कागदपत्रे व साक्षी पुरावे जसेच्या तसे न घेता, सहकार आयुक्त कार्यालयाने दि.३०.८.२०१८ च्या परीपत्रकात नमुद सविस्तर बाबी तसेच विभागीय चौकशी नियम पुस्तिका १९९१ मध्ये नमूद तरतूदी / मार्गदर्शनानूसार विभागीय चौकशीचा प्रस्ताव तयार करुन तो वरिष्ठ कार्यालयास सादर करावा.

**४. <u>लाचलुचपत प्रतिबंधक कायदा/ फौजदारी गुन्हा दाखल होऊन अटक झाल्यानंतर जामिन मंजूर केलेल्या अधिकारी / कर्मचारी यांनी घेतलेल्या धोरणात्मक / वैधानिक निर्णयाबाबत- :-</u>**

४.१ लाचलुचपत / फौजदारी गुन्हयात अटक करण्यात आलेल्या संबंधीत अधिकारी/कर्मचारी यांना जामिन मिळाल्यानंतर व निलंबन होईपर्यंतच्या कालावधीत काही धोरणात्मक अथवा वैधानिक निर्णय घेण्यास प्रतिबंध करण्यात यावा.

**५.** वरीलप्रमाणे निर्देशांची काटेकोरपणे अंमलबजावणी करण्यात यावी.

हे शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१८१२२९१६१०४९१३०२ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Manjiri
Ganeshbhushan Joshi

Digitally signed by Manjiri Ganeshbhushan Joshi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co-Operation Marketing And Textile Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=91b4708db2a52d675f7f30d81444f3844833dfc7c86d4244ee1075c97c713180, serialNumber=7d5731d128ab41d6a090557a2e9658b7382ac03af6e239ba66cc1cf9a6cf2f52, cn=Manjiri Ganeshbhushan Joshi
Date: 2018.12.29 16:20:10 +05'30'

**( मं.ग. जोशी )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. साखर आयुक्त, साखर आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
३. संचालक वस्त्रोद्योग, वस्त्रोद्योग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, नागपुर.
४. मा.आयुक्त, राज्य सहकारी निवडणुक प्राधिकरण, पुणे.
५. मा.आयुक्त, आदिवासी विकास विभाग, नाशिक.
६. पणन संचालक, पणन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, नागपुर
७. विभागीय सहनिबंधक सहकारी संस्था (प्रशासन / लेखापरीक्षण) (सर्व)
८. सह निबंधक, सहकारी संस्था, (दुग्ध), मुंबई
९. जिल्हा उपनिबंधक सहकारी संस्था (सर्व)
१०. जिल्हा विशेष लेखापरीक्षक सहकारी संस्था (सर्व)
११. निवडनस्ती.